**राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी व तसेच उर्वरित ठिकाणच्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी पाळीकरिता कंत्राटी कर्मचाऱ्यांऐवजी तासिका तत्वावर शिक्षकीय कर्मचाऱ्यांची नेमणूक करण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन

**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आयटीआय-२०१५/प्र.क्र. ०५/व्यशि-३**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र. आयटीआय-२०१०/प्र.क्र. ६४/ व्यशि-३, दि. २३.०८.२०१०
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र. आयटीआय-२०१०/प्र.क्र. ६४/ व्यशि-३, दि. २६.०७.२०१०

**प्रस्तावना :**

राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी तसेच उर्वरित ठिकाणच्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी पाळी कायमस्वरूपी सुरू करण्यास संदर्भीय (१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये ऑगस्ट, २०१० च्या सत्रापासून दुसरी व तिसरी पाळी सुरू करण्यासाठी १२३९ व्यवसाय तुकडयांसाठी आवश्यक असलेल्या १२३९ शिल्पनिदेशक, ५७ गट निदेशक, २०४ गणित व चित्रकला निदेशक अशा एकूण १५०० कंत्राटी शिक्षकीय पदांची निर्मिती दरमाह रू. १५०००/- या ठोक मासिक वेतनावर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

सदर नियुक्त्या हया जास्तीत-जास्त दोन वर्ष कालावधीसाठी असून त्यानंतर या नियुक्त्या आपोआप संपृष्टात येणार आहेत. संबंधित शिक्षकांचे कामकाज समाधानकारक आढळल्यास, आवश्यकतेनुसार नव्याने कंत्राटी तत्वावर नियुक्ती देवून पुनश्च: दोन वर्षाच्या कालावधीसाठी सदर पदे भरण्याची दिनांक २३.०८.२०१० च्या शासन निर्णयात तरतूद आहे. शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदर पदांची मुदत दि. २२/८/२०१२ रोजी संपल्याने या कंत्राटी पदांना दिनांक २३.०८.२०१२ ते २२.०८.२०१४ या कालावधीसाठी नव्याने नियुक्ती देण्यास दिनांक ०६.०८.२०१२ च्या अर्ध शासकीय पत्रान्वये मंजूरी देण्यात आली आहे.

सदर कंत्राटाचा कालावधी डिसेंबर २०१४ ते डिसेंबर, २०१५ या दरम्यान टप्प्याटप्प्याने संपुष्टात येणार आहे. कंत्राटाचा कालावधी चार वर्ष झाल्यानंतर पुन्हा पुनर्नियुक्ती देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसऱ्या/तिसऱ्या पाळीत प्रवेशित प्रशिक्षणार्थीचे नुकसान होवू नये यासाठी संदर्भीय (२) येथील शासन निर्णयान्वये तासिका तत्वावर प्रशिक्षक नेमून प्रशिक्षणार्थ्यींना प्रशिक्षण देण्याची तरतूद आहे. त्या अनुषंगाने औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी/तिसरी पाळीकरिता कंत्राटी कर्मचाऱ्यांऐवजी तासिका तत्वावर शिक्षकीय कर्मचाऱ्यांची नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील दुसरी व तिसरी पाळी व तसेच उर्वरित ठिकाणच्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील दुसरी पाळीतील ज्या कर्मचाऱ्यांच्या सेवा संपुष्टात आल्या आहेत तसेच ज्यांच्या सेवा संपुष्टात येणार आहेत अशा कंत्राटी कर्मचाऱ्यांऐवजी तासिका तत्वावर शिक्षकीय कर्मचाऱ्यांची नेमणूक करण्यास संदर्भीय (२) येथील शासन निर्णयामधील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे. संबंधित संस्थेने तासिका तत्वावरील नेमणूक केलेल्या शिक्षकीय कर्मचाऱ्यांना डी.जी.ई.टी., नवी दिल्ली यांच्या निकषानुसार सैधांतिक व प्रात्यक्षिक तास सोपविण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१५१६५२३७१९०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Madhav Patil

Digitally signed by Vivek Madhav Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=841bf2ba2d65f151b54b8b93f50469596d17aeec76b11455a90a9edb7b50ff1, cn=Vivek Madhav Patil
Date: 2015.10.17 12:05:48 +05'30'

**(विवेक मा. पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मुंबई यांचे खाजगी सचिव
३) मा.प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मुंबई यांचे स्वीय सहायक,
४) सह सचिव (व्यशि), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक

५) संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
६) संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई
७) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनालयामार्फत)
८) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)
१२) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, (संचालनालयामार्फत)
१३) संबंधित प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत)
१४) निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मुंबई.